नांदेड उर्दू घराच्या वाचनालयासाठी पुस्तके खरेदी करणे तसेच सुरक्षा रक्षकांचे मानधन अदा करण्यासाठी वर्ष २०१९-२० या आर्थिक वर्षात निधी वितरित करणेबाबत...

# महाराष्ट्र शासन
## अल्पसंख्याक विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः नाउघ २०१७/प्र.क्र.२३३/का.४

मादाम कामा रोड, हुतात्का चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १७.०३.२०२०

**वाचा -**

१) अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः उघव्य २०१६/प्र.क्र.१९/कार्या-४, दि.२१ जुलै, २०१६
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अर्थसं- २०१९/प्रक्र.४४/अर्थ-३, दि.०१ एप्रिल, २०१९
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अर्थसं- २०१९/प्रक्र.९२/अर्थ-३, दि.८ जुलै, २०१९
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अर्थसं- २०१९/प्रक्र.९२/अर्थ-३, दि.२२ जानेवारी, २०२०
५) जिल्हाधिकारी, नांदेड यांचे पत्र क्रमांक, अल्पसंख्याक/सां.शा.-१/उर्दू घर/१२८३९, दि.०२.०३.२०२०
६) जिल्हाधिकारी, नांदेड यांचे पत्र क्रमांक, अल्पसंख्याक/सां.शा.-१/उर्दू घर/१२८३८, दि.०२.०३.२०२०

**प्रस्तावना -**

नांदेड येथील उर्दू घराच्या वाचनालयासाठी पुस्तके खरेदी करणे तसेच सुरक्षा रक्षकांचे मानधन अदा करण्यासाठी अनुदान वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय -

संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्यातील उर्दू घरांचा वापर, देखभाल व दुरुस्ती तसेच उर्दू घरे सुस्थितीत ठेवण्यासदंर्भात नियामवली विहित करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयानुसार उर्दू घरांचे नियंत्रण व व्यवस्थापन संबंधित जिल्हाधिकारी किंवा त्यांनी प्राधिकृत केलेले, उप-जिल्हाधिकारी पेक्षा कमी नाही अशा दर्जाचे अधिकारी, यांचे मार्फत करण्यात येणार आहे. त्यानुसार जिल्हाधिकारी, नांदेड यांनी त्यांच्या संदर्भ क्र.५ व ६ येथील पत्रान्वये, नांदेड येथील उर्दू घराच्या वाचनालयासाठी पुस्तके खरेदी करणे तसेच सुरक्षा रक्षकांचे मानधन अदा करण्यासाठी मागणी सादर केली आहे. उर्दू घरासाठी सन २०१९-२० या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या रु.८,५०,००, ०००/- (रुपये आठ कोटी पन्नास लाख मात्र) इतक्या योजनांतर्गत अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आलेली आहे. वित्त विभागाच्या वरील संदर्भ क्र.२, ३ व ४ येथील शासन परिपत्रकातील मान्यतेस अनुसरुन, ६०% च्या मर्यादेत राहून नांदेड उर्दू घराच्या

वाचनालयासाठी पुस्तके खरेदी करणे तसेच सुरक्षा रक्षकांचे मानधन अदा करणे यासाठी एकूण रु.३३,५९,०००/- (रुपये तेहतीस लाख एकोणसाठ हजार मात्र)[पुस्तक खरेदी रु.१८,६८,०००+ सुरक्षा रक्षकांचे मानधन रु.१४,९१,०००/-] इतके अनुदान जिल्हाधिकारी, नांदेड यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. जिल्हाधिकारी, नांदेड यांनी सदर खर्च विहीत मर्यादेत राहील याची दक्षता घ्यावी.

जिल्हाधिकारी, नांदेड यांना सन २०१९-२० या आर्थिक वर्षात वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या रु.३३,५९,०००/- (रुपये तेहतीस लाख एकोणसाठ हजार मात्र) इतकी रक्कम अर्थसंकल्पीय प्रणालीमधून आहरण व संवितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे. त्यांनी सदर निधीच्या विनियोगाबाबचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

यावर होणारा खर्च “मागणी क्रमांक झेडई-१ २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण - २००- इतर कार्यक्रम-राज्य योजनांतर्गत योजना- (००)-(००)(१८) - उर्दू घरासाठी सहाय्यक अनुदाने (२२३५ ए ५५२) ३१, सहायक अनुदान (वेतनेतर)” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०१९-२० या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अर्थसं- २०१९/प्रक्र.९२/अर्थ-३, दि.२२ जानेवारी, २०२० अन्वये विभागांना प्रदान केलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१७११३७५२७९१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tushar Dilip Rathod

Digitally signed by Tushar Dilip Rathod
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e7e9706be693397ead11bd0e0b8fbaec45488529c8b57466dbf3e7c095089c08, serialNumber=b88babb31cb2c1163b5a1e41e86d809272fea914814734600d0b42642848c06f, cn=Tushar Dilip Rathod
Date: 2020.03.17 14:01:10 +05'30'

( तुषार दि.राठोड )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य,मुंबई/ नागपूर,
२. आयुक्त, औरंगाबाद महसूल विभाग, औरंगाबाद,
३. जिल्हाधिकारी, नांदेड,
४. अतिरिक्त जिल्हाधिकारी, नांदेड
५. आयुक्त, नांदेड वाघाळा महानगरपालिका, नांदेड,
६. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई,
७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नांदेड,
८. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड,

९. अधीक्षक-नि-कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य उर्दु साहित्य अकादमी, मुंबई,
१०. खाजगी सचिव, मा.मंत्री/मा.राज्यमंत्री (अ.वि.वि.) यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई,
११. स्वीय सहायक, अपर मुख्य सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. स्वीय सहायक, सह सचिव (अ.वि.वि.),अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. कक्ष अधिकारी (का-७). अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. वित्त विभाग / नियोजन विभाग / सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५. निवड नस्ती (का-४)/कार्यासन-४, संग्रहार्थ.